**मौजे पिंपराळा, ता. वसमत, जि. हिंगोली हे गाव पांगारा शिंदे प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यक्षेत्रातून वगळून त्याच तालुक्यातील कुरूंदा प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१४/ प्र.क्र.८१/ आरोग्य-४**

मंत्रालय,१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीखः २१ जुलै,२०१४.

__वाचा__

**सहसंचालक, आरोग्य सेवा ( प्राआकेंद्र, जिपस्तर ), मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/ जिपस्तर/प्राआकेंद्र/उपकेंद्र/हिंगोली/टे-७/कक्ष-७ अ/१४, दिनांक ४.०३.२०१४/ ४६७.**

__प्रस्तावना__

हिंगोली जिल्ह्यातील वसमत तालुक्यात राज्य शासनाच्या आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील ६ प्राथमिक आरोग्य केंद्रे कार्यान्वित आहेत. या ६ प्राथमिक आरोग्य केंद्रांच्या कार्यक्षेत्रात २६ आरोग्य उपकेंद्रे आहेत. त्यापैकी पांगराशिंदे या प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यकक्षेत पांगराशिंदे, शिरोळी, वाई व आंबा ही आरोग्य उपकेंद्रे आहेत. या आरोग्य उपकेंद्रांपैकी आंबा या आरोग्य उपकेंद्रांतर्गत पिंपराळा हे गाव आहे. पिंपराळा हे गाव पांगराशिंदे प्राथमिक आरोग्य केंद्राच्या स्थानापासून २० ते २५ किलोमीटर अंतरावर असून कुरूंदा प्राथमिक आरोग्य केंद्राच्या स्थानापासून ५ ते ६ किलोमीटर अंतरावर आहे. या अनुषंगाने पिंपराळा हे गाव प्राथमिक आरोग्य केंद्र, कुरूंदा अंतर्गत कुरूंदा आरोग्य उपकेंद्राच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट करण्याबाबत जिल्हा परिषद, हिंगोलीच्या सर्वसाधारण सभेत निर्णय घेण्यात आला आहे. याअनुषंगाने मौजे पिंपराळा, ता. वसमत, जि. हिंगोली हे गाव पांगारा शिंदे प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यक्षेत्रातून वगळून त्याच तालुक्यातील कुरूंदा प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

__शासन निर्णय__

हिंगोली जिल्ह्यातील वसमत तालुक्यातील पांगराशिंदे प्राथमिक आरोग्य केंद्रांतर्गत आंबा आरोग्य उपकेंद्राच्या कार्यकक्षेत असलेले पिंपराळा गाव पांगराशिंदे प्राथमिक आरोग्य केंद्राच्या कार्यक्षेत्रातून काढून त्याच तालुक्यातील कुरूंदा प्राथमिक आरोग्य केंद्रांतर्गत कुरूंदा आरोग्य उपकेंद्राच्या कार्यक्षेत्रात समाविष्ट करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२१११४२०७६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TAKATE PARAJI M

Digitally signed by TAKATE PARAJI M
DN: CN = TAKATE PARAJI M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.07.22 12:25:26 +05'30'

**पा.म.ताकटे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र- जिपस्तर), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (लेखा व लेखापरिक्षा), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हाधिकारी, हिंगोली.
८. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन व विकास मंडळ, हिंगोली.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
१०.जिल्हा शल्य चिकित्सक, हिंगोली.
११.जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
१२.अवर सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती (आरोग्य-४).